**राज्य कामगार विमा योजनेअंतर्गत अस्थायी वैद्यकीय अधिकारी, गट-अ यांच्या समावेशनाबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकावि-२०२०/प्र.क्र.९८/सेवा-१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, ८ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४००००१.
दिनांक :- ०५ नोव्हेंबर, २०२०.

वाचा :-

**१) शासन अधिसूचना क्र.राकावि-१००८/प्र.क्र.१८५/सेवा-१, दि.१८.०३.२०१५**

**२) आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे क्र.आयुक्त/राकावियो/समावेशन/ वैद्य/ गट-अ व ब/ का.क्र.१/१७६१८-२०/२०१९, दि.२०.१२.२०१९.**

**३) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे सिव्हील रिट याचिका क्र.११४४०/२०१८मधील दि.०५.०७.२०१९ रोजीचे आदेश.**

प्रस्तावना

राज्य कामगार विमा योजनेअंतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ व गट-ब संवर्गातील अस्थायी स्वरूपात कार्यरत असलेल्या व दि.१.१.२०१४ रोजी ३ वर्षाची सेवा पूर्ण केलेल्या ७० अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांचे विभागांतर्गत मंजूर असलेल्या पदांवर कायमस्वरूपी समावेशन करण्याबाबत दि.२१.०८.२०१४ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत निर्णय घेण्यात आला आहे. त्यास अनुसरून सदर ७० अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या समावेशनाबाबतची अधिसूचना वाचा क्र.१, दि.१८.०३.२०१५ रोजी निर्गमित करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे राज्य कामगार विमा योजनेतील गट-अ व गट-ब संवर्गातील अस्थायी वैद्यकीय अधिकारी या पदांची निवडप्रक्रिया महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतून वगळण्यास मान्यता देण्यात आली आहे.

एकुण ७० अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांपैकी ज्यांची सेवा ११ महिन्यांच्या तत्वावर आहे व ज्यांना सेवेत तांत्रिक खंड देऊन अस्थायी स्वरुपात सेवेत ठेवण्यात आले आहे, अशा वैद्यकीय अधिकाऱ्यांपैकी डॉ.मनिषा गायकवाड व इतर ११ जण यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र.११४४०/२०१८ दाखल केली आहे. या प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दि.०५.०७.२०१९ रोजी वाचा क्र.३ येथील आदेश देऊन ज्या याचिकाकर्त्यांनी हमीपत्र दिले आहे व ज्यांना अधिसूचनेतील अटी व शर्ती मान्य आहेत, त्यांचे समावेशन दि.१८.०३.२०१५ रोजीच्या अधिसूचनेनुसार करावे असे निर्देश दिले आहेत. ज्यांची सेवा ११ महिन्यांच्या तत्वावर आहे व ज्यांना सेवेत तांत्रिक खंड देऊन अस्थायी स्वरुपात सेवेत ठेवण्यात आले आहे व ज्यांनी दि.१८.०३.२०१५ रोजीच्या अधिसूचनेनुसार अटी व शर्ती मान्य असल्याचे हमीपत्र दिले आहे, अशा एकुण १२ कार्यरत अस्थायी वैद्यकीय अधिकारी याचिकाकर्त्यांचे समावेशन करण्याची कार्यवाही विचाराधीन आहे. याबाबत पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य कामगार विमा योजनेअंतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ संवर्गातील अस्थायी स्वरूपात कार्यरत असलेल्या व दि.१.१.२०१४ रोजी ३ वर्षाची सेवा पूर्ण केलेल्या आणि ज्यांना सेवेत तांत्रिक खंड देऊन अस्थायी स्वरुपात सेवेत ११ महिन्यांच्या तत्वावर ठेवण्यात आले आहे व ज्यांनी दि.१८.०३.२०१५ रोजीच्या अधिसूचनेनुसार अटी व शर्ती मान्य असल्याचे हमीपत्र दिले आहे, अशा खालील तक्त्यात दर्शविलेल्या एकुण १२ कार्यरत अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या सेवा दि.१८.०३.२०१५ रोजीच्या अधिसूचनेच्या दिनांकापासून नियमित करण्यात येत आहेत. (सदर १२ जण रिट याचिका क्र.११४४०/२०१८ मधील याचिकाकर्ते आहेत.)

| अ.क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्याचे नाव | समावेशनानंतरचे नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | डॉ. अमेय पोवार | रा.का.वि.योजना रुग्णालय, वरळी |
| २ | डॉ. (श्रीमती) कपिला जाधव | रा.का.वि.योजना रुग्णालय, वरळी |
| ३ | डॉ. (श्रीमती) मनिषा गायकवाड | रा.का.वि.योजना रुग्णालय, कांदिवली |
| ४ | डॉ. रुपा भरोटे | रा.का.वि.योजना रुग्णालय, उल्हासनगर |
| ५ | डॉ. स्मिता दहेकर | रा.का.वि.योजना रुग्णालय, नाशिक अंतर्गत से.द.सिडको |
| ६ | डॉ.ज्योती चौधरी | रा.का.वि.योजना रुग्णालय, नाशिक अंतर्गत से.द.अंबड |
| ७ | डॉ. जयश्री फड | रा.का.वि.योजना रुग्णालय, नाशिक |
| ८ | डॉ. सतीश पवार | रा.का.वि.योजना रुग्णालय, नाशिक अंतर्गत से.द.सातपूर. |
| ९ | डॉ. (श्रीमती) ज्योती जगताप | रा.का.वि.योजना रुग्णालय, औरंगाबाद |
| १० | डॉ .कश्यप व्दिवेदी | वै.प्र.अ. रा.का.वि.योजना, मुंबई यांचे कार्यालय |
| ११ | डॉ. पद्मा पवाणे. | रा.का.वि.योजना , नागपूर अंतर्गत से.द. (बजेरिया), बुट्टीबोरी |
| १२ | डॉ. (श्रीमती) प्रिती कराळे | रा.का.वि.योजना, नागपूर अंतर्गत से.द. बुट्टीबोरी, (पुलगाव) |

वरील अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांचे समावेशन हे खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून करण्यात येत आहे.-

१) हे समावेशन राज्य कामगार विमा योजनेअंतर्गत एकवेळचे समावेशन असून शासन अधिसूचना क्र.राकावि-१००८/प्र.क्र.१८५/सेवा-१, दि.१८.०३.२०१५ रोजी मधील अटी व शर्तीनुसार त्या अधिसूचनेच्या दिनांकापासून त्यांचे समावेशन करण्यात येत आहेत.

२) अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांचे, ज्या संवर्गातील पदांसाठी समावेशन होईल त्या संवर्गातील पदासाठी लागू असलेल्या वेतनश्रेणीमध्ये प्रारंभिक मूळ वेतन निश्चिती करण्यात यावी.

३) अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांची परस्पर सेवा ज्येष्ठता त्यांच्या पहिल्या अस्थायी वैद्यकीय अधिकारी म्हणून नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून निश्चित करण्यात यावी.

४) अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांची समावेशनापूर्वीची सेवा ही वेतन, सेवानिवृत्ती वेतन, रजा, सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेसाठी, विशेषज्ञ किंवा अन्य पदावरील पदोन्नतीसाठी विचारात घेण्यात येऊ नये.

५) समावेशन झालेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना समावेशनाच्या दिनांकापासून किमान ६ वर्षे उच्च शिक्षणासाठी प्रतिनियुक्तीवर जाता येणार नाही.

६) अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांचे सेवानिवृत्ती वेतन व सेवानिवृत्ती विषयक लाभ शासनाच्या नवीन परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेतील अटी व शर्तीस अधीन राहून अनुज्ञेय राहतील.

७) अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या समावेशनापूर्वी त्याचे गोपनीय अहवाल व त्यांच्याविरुध्द काही चौकशी सुरु असल्यास त्याची छाननी करण्यात येईल. तथापि, चौकशीच्या अहवालावर समावेशनानंतर निर्णय घेण्यात येईल आणि असा निर्णय अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांवर बंधनकारक राहील.

८) अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांचे समावेशन करताना शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्ती मान्य असल्याचे हमीपत्र प्रत्येक अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांकडून घेण्यात येईल व ज्यांना शासनाने ठरवून दिलेल्या अटी व शर्ती मान्य नाहीत अशा अस्थायी वैद्यकीय अधिकाऱ्यांचे समावेशन करण्यात येणार नाही.

९) समावेशन करताना जातीच्या विशिष्ट प्रवर्गामध्ये अनुशेष दिसून आल्यास त्याचा ताळमेळ भविष्यात होणाऱ्या सेवाभरतीच्या वेळी घालण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२११५५०१८९७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra R Gadhari

Digitally signed by Ravindra R Gadhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9668226de60c3cc5b8ccd56833c07d32831e4140f3de291d1f40d510d295643f, serialNumber=8f564edcac5a4c4a79542e69f18152eb1ab86474731f4ac3d8424b8b56a653e1, cn=Ravindra R Gadhari
Date: 2020.11.05 12:08:56 +05'30'

(र. र. गढरी)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
२. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखाअनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर.
३. संचालक(प्रशासन/वैद्यकीय), राज्य कामगार विमा योजना, मुंबई
४. वैद्यकीय अधिक्षक, रा.का.वि.यो.रुग्णालय, वरळी/मुलुंड/ वाशी/कांदिवली/ ठाणे/ उल्हासनगर /पुणे/नाशिक/सोलापूर/औरंगाबाद/नागपूर.
५. वैद्यकीय प्रशासन अधिकारी, मुंबई/पुणे/ नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/ठाणे/ पुणे/नाशिक/सोलापूर/औरंगाबाद/नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
९. संबंधित वैद्यकीय अधिकारी (आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे मार्फत)
१०. निवडनस्ती - सेवा-१.